नवीन महाविद्यालये, विद्याशाखा, अभ्यासक्रम/ विषय व वाढीव तुकडया यांना मंजूरी देण्यासाठी कार्यपध्दती व निकष विहित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१६/(१८९/१६)/विशि-४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २१ एप्रिल, २०१७

**वाचा :** शासन निर्णय समक्रमांक दि. ९ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र विधानमंडळाने मंजूर केलेल्या व दिनांक ११ जानेवारी, २०१७ रोजी राजपत्रात प्रसिध्द झालेल्या महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०७ (१) मध्ये विद्यापीठे प्रत्येक पाच वर्षांनी एक सम्यक योजना तयार करतील व महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाची मान्यता मिळवतील अशी तरतूद आहे. सम्यक योजनेच्या अनुषंगाने नविन महाविद्यालये किंवा परिसंस्था,नवीन अभ्यासक्रम, विद्याशाखा, विषय, तुकडया व सॅटलाईट केंद्रे यांना मान्यता देण्याची कार्यपध्दती नमुद कलम १०९ मध्ये विषद करण्यात आली आहे. सद्यस्थितीत महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८१, ८२ व ८३ च्या अनुषंगाने शासन निर्णय दि.३०/१०/२०१० व दि.२/९/२०१३ अन्वये नविन महाविद्यालये किंवा परिसंस्था,नवीन अभ्यासक्रम, विद्याशाखा, विषय व नवीन तुकडयांना मंजुरी देण्याबाबतच्या तरतुदी विहीत करण्यात आलेल्या आहेत. नविन महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम-२०१६ मधील कलम १०७ व १०९ च्या अनुषंगाने सदरहु तरतूदी व निकष अधिक स्पष्ट तसेच तपशिलवार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०७ व १०९ च्या अनुषंगाने नवीन महाविद्यालये किंवा परिसंस्था, अभ्यासक्रम, विद्याशाखा, विषय, नविन तुकडया व सॅटलाईट केंद्रे इत्यादींना मंजूरी देण्यासाठीची कार्यपध्दती, निकष अंतिम करण्यासाठी दि. ९ फेब्रुवारी, २०१७ रोजीच्या शासन निर्णयन्वये तज्ञ समितीची नियुक्ती करण्यात आली होती. तथापि, कार्य बाहुल्यामुळे सहसचिव (वि.शि) व उपसचिव (म.शि) यांना उपस्थित राहणे शक्य नसल्याने, सदर समिती मधून त्यांची नांवे वगळण्यात येत आहेत. तसेच संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची "सदस्य" ऐवजी "सदस्य सचिव" म्हणून नेमणून करण्यात येऊन खालीलप्रमाणे तज्ञ समितीची नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | डॉ. आर.एस.माळी, माजी कुलगुरू, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव. | अध्यक्ष |
| २. | प्रा. अनिल राव, सेवानिवृत्त प्राचार्य, जळगाव. | सदस्य |
| ३. | श्री.व्यंकटरमणी,माजी कुलसचिव, मुंबई विद्यापीठ,मुंबई. | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४. | प्रा.व्ही.एन.मगरे, प्राचार्य, किर्ती महाविद्यालय. | सदस्य |
| ५. | संचालक, उच्च शिक्षण,महाराष्ट्र राज्य, पुणे. | सदस्य सचिव |
| ६. | सहसंचालक, उच्च शिक्षण, कोकण विभाग, पनवेल. | सदस्य |

२. उपरोक्त तज्ञ समिती ही महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०७ व १०९ मधील तरतूदींच्या अनुषंगाने सविस्तर अभ्यास करून नवीन महाविद्यालये किंवा परिसंस्था , नवीन अभ्यासक्रम, विषय, विद्याशाखा, अतिरिक्त तुकडया किंवा सॅटलाईट केंद्रे इत्यादींना मंजूरी देण्याची कार्यपध्दती निकष निश्चित करुन शासन निर्णयाचा मसुदा १५ दिवसाचे आत शासनास सादर करील. तसेच कवि कुलगुरु, कालिदास संस्कृत विद्यापीठांतर्गत मान्यता प्रदान करावयाची नविन महाविद्यालये पाठ्यक्रम/विषय/विद्याशाखा/तुकडी या संदर्भात नविन निकष विहीत करण्याबाबतही शासनास शिफारस करील .

३. सदरहू समितीच्या बैठका एस.एन.डी.टी महिला विद्यापीठ, चर्चगेट, मुंबई येथे होतील व सदरहू बैठकीसाठी उपस्थित अशासकीय सदस्यांचे मानधन व प्रवासभत्ता एस.एन.डी.टी महिला विद्यापीठाकडून अदा करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२११३३७१३३००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2017.04.21 13:38:47 +05'30'

**(सिध्दार्थ खरात)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आर.एस.माळी, माजी कुलगुरू, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.
२. प्रा. अनिल राव, सेवानिवृत्त प्राचार्य, जळगाव.
३. श्री. व्यंकटरमणी, माजी कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
४. प्रा.व्ही.एन.मगरे, प्राचार्य, किर्ती महाविद्यालय.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६. सहसंचालक,उच्च शिक्षण, कोकण विभाग, पनवेल.

७. मा.मंत्री,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८. मा.राज्यमंत्री,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

९. मा.अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई. यांना माहितीस्तव अग्रेषित.

१०. सह सचिव (वि.शि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग,यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई. यांना माहितीस्तव अग्रेषित.

११. उप सचिव (म.शि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई. यांना माहितीस्तव अग्रेषित.

१२. निवडनस्ती (विशि-४).